सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत आंतरपिक पद्धतीद्वारे कडधान्य पिकांच्या उत्पादनास चालना देण्याचा प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि ०४१५/प्र.क्र. ९३/राकृवियो कक्ष**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ६ नोव्हेंबर, २०१५

वाचा : राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या २०व्या बैठकीचे इतिवृत्त-शासन पत्र क्र. RKV-0415/C.R.38/RKVY CELL, Date. 18th June, 2015.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) च्या मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि. १८ जून, २०१५ च्या २० व्या बैठकीत सन २०१५-१६ करीता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत आंतरपिक पद्धतीद्वारे कडधान्य पिकांच्या उत्पादनास चालना देण्याचा प्रकल्पास मंजूरी देण्याचा निर्णय घेण्यात आला होता.

सदर प्रकल्पांतर्गत राज्यातील २८ जिल्हयांमध्ये आंतरपिक पध्दतीव्दारे कडधान्य पिकांच्या उत्पादकतेमध्ये वाढ करणे, क्षेत्र विस्तारास मोठया प्रमाणात चालना देणे तसेच उत्पादित मालाच्या विक्रीकरीता उपक्रम राबविणे तसेच शेतकऱ्यांची आर्थिक स्थिती सुधारणे इ. घटकांसह प्रकल्प राबविण्यात येणार आहे. त्यानुषंगाने, आंतरपिक पध्दतीव्दारे कडधान्य प्रकल्पाच्या अंमलबजावणी प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, तदनुषंगाने शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्यातील २८ जिल्हयांध्ये आंतरपिक प्रकल्पाद्वारे कडधान्य पिकांच्या उत्पादनास चालना देण्याचा प्रकल्पाच्या अंमलबजावणीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे तसेच, चालू वर्षाकरीता या प्रकल्पास राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत ₹ ५.५० कोटी (रुपये पाच कोटी पन्नास लाख फक्त) निधी पुढीलप्रमाणे घटक निहाय भौतिक व आर्थिक लक्षांकासह मंजूर करण्यात येत आहे.

| राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत अंतरपीक पध्दतीने कडधान्य लागवड प्रकल्प सन २०१५-१६ (रु.लाखात) | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **घटक** | **मापदंड** | | **लक्षांक** | | **समाविष्ट जिल्हे** |
| | | **अर्थसहाय्य** | **योजना** | **भौतिक (हे.)** | **आर्थिक** | |
| **बियाणे** | | | | | | |
| १ | सोयाबीन + तूर | रुपये ४८०/- प्रति हेक्टर | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान | ६२५०० हेक्टर | ३००.०० | ठाणे, नंदूरबार, औरंगाबाद, परभणी, यवतमाळ, रायगड, जळगाव, जालना, हिंगोली, वर्धा, पालघर, धुळे, बीड, बुलढाणा, नागपूर, रत्नागिरी, सातारा, लातूर, अकोला, चंद्रपूर, सिंधुदूर्ग, सांगली, उस्मानाबाद, वाशिम, अमरावती, नाशिक, कोल्हापूर, नांदेड |
| २ | कापूस + मुग | रुपये ५६०/- प्रति हेक्टर | | १२५०० हेक्टर | ६०.०० | |
| ३ | कापूस + उडीद | रुपये ५६०/- प्रति हेक्टर | | २५००० हेक्टर | १४०.०० | |
| ४ | भात पिकाच्या बांधावर तूर लागवड | रुपये ४८०/- प्रति हेक्टर | | २५००० हेक्टर | ४५.०० | |
| **आयुक्तालयास्तर ( संकीर्ण १%)** | | | | | ५.४५ | |
| **एकुण** | | | | | ५५०.४५ | |

२. सदर प्रकल्पास अन्न सुरक्षा अभियान योजनेंतर्गत अनुदानाच्या मानकांनुसार (Cost norms) अनुदान मंजूर करण्यात येईल.

३. सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत आंतरपिक पद्धतीद्वारे कडधान्य पिकांच्या उत्पादनास चालना देण्याचा प्रकल्प राबविण्यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना कार्यान्वयन तसेच संनियंत्रण करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी केंद्र शासनाच्या प्रचलित योजनांच्या मार्गदर्शक सूचनांस अनुसरुन कृषि विभागाच्या कार्यालयीन कार्य पध्दतीत अंतर्भाव करावा तसेच, प्रकल्पांतर्गत समाविष्ट जिल्ह्यांना भौतिक व वित्तीय लक्षांक विहित करुन आवश्यकतेनुसार मंजूर निधीचे वेळोवेळी वितरण करावे.

४. संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांकडे आंतरपिक पद्धतीद्वारे कडधान्य पिकांच्या उत्पादनास चालना देण्याच्या प्रकल्पाकरीता निधी प्राप्त झाल्यानंतर तालुका कृषि अधिकाऱ्यांनी लाभार्थ्यांची निवड करुन सदर प्रकल्प राबविण्याच्या दृष्टीने लाभार्थ्यांची यादी तालुका कृषि अधिकाऱ्यांच्या स्तरावर संकलित करण्यात यावी. सदर यादीमध्ये शेतकऱ्याचे नांव, गांव, सर्वे/गट क्रमांक

याच्यासह, मोबाईल / दुरध्वनी क्रमांक, बँक खाते क्रमांक, आधार क्रमांक इ. पैकी किमान एकाची माहिती संकलित करण्यात यावी.

५. सदर लाभार्थ्यांच्या यादीनुसार सर्व लाभार्थी शेतकऱ्यांच्या शेतावर हाती घेण्यात आलेल्या बाबींची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहायकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिकाऱ्यांमार्फत जिल्हा अधिक्षक कृषि अधिकाऱ्यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहायकांचे अहवाल प्राप्त होताच सदर प्रकल्पांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी विहित करावे.

६. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना वा सदर शेतक-यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे, त्याचप्रमाणे केंद्र शासनाने संदर्भांकित दि. ९/०७/२०१५ रोजीच्या पत्रान्वये अभियानांतर्गत ज्या घटकांखाली थेट लाभार्थ्यांच्या खाती अनुदान जमा करण्याचे (Direct Benefit Transfer) निदेशीत केले आहे त्या घटकांची चालू वर्षी केंद्र शासनाच्या निदेशानुसार अंमलबजावणी करण्यात यावी.

७. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत आंतरपिक पद्धतीद्वारे कडधान्य पिकांच्या उत्पादनास चालना देण्याचा प्रकल्प राबविण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत असलेला ₹ ५.५० कोटी निधी सन २०१५- १६ या चालू वित्तीय वर्षात अखर्चित राहणार नाही याची अंमलबजावणी यंत्रणांनी काळजी घ्यावी. तसेच संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

८. शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०६१३०३४५६७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2015.11.06 13:06:08 +05'30'

**(श्रीकांत चं. आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
११.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१४.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१५.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१६.मा. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१७.मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती.